**हिंगणघाट नगरपरिषदे अंतर्गत शिपाई संवर्गाचे काल्पनिक पद निर्माण करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः- न्यायाप्र-२०२५/प्र.क्र.१०/नवि-१८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
४ था मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २६ मार्च, २०२५

**संदर्भ:-** १) मा. औद्योगिक न्यायालय, नागपूर खंडपीठ, नागपूर यांचे COMPLAINT (यु.एल.पी) क्रमांक २७७/२००० मध्ये दिनांक १४/०१/२००८ रोजी पारीत केलेले आदेश.

२) मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपूर येथे दाखल रिट याचिका क्रमांक ३४०६/२००८ मध्ये पारित दिनांक २८/०१/२०१६ रोजी पारीत केलेले आदेश.

३) मा. औद्योगिक न्यायालय, नागपूर यांचे Comp ULP No-११/२०२१ मध्ये दिनांक २३/०८/२०२३ रोजी पारीत केलेले आदेश.

४) मा. कामगार न्यायालय, वर्धा येथे अवमान याचिका Contempt Complaint /४/२०२४ मध्ये दिनांक ३१/०८/२०२४ रोजी पारीत केलेले आदेश.

५) नगरपरिषद प्रशासन संचालनालय, बेलापूर, नवी मुंबई यांचे पत्र क्र.नपप्रसं/ नप हिंगणघाट/रेखा सोळंकी/मा.न्या./२०२४/ कक्ष-४,८८११,दिनांक २७/१२/२०२४.

**<u>प्रस्तावना</u>:-**

श्रीमती रेखा विजयसिंग सोळंकी या हिंगणघाट नगरपरिषद, जिल्हा वर्धा येथे दि.११.१२.१९९२ पासून शिपाई या पदावर रोजंदारी म्हणून कार्यरत होत्या. श्रीमती रेखा विजयसिंग सोळंकी यांनी सेवेत सामावून घेण्याबाबत मा. औद्योगिक न्यायालय, नागपूर येथे COMPLAINT(ULP) No.-२७७/२००० तक्रार दाखल केली होती. सदर तक्रारीच्या अनुषंगाने मा. औद्योगिक न्यायालयाने दिनांक १४/०१/२००८ रोजी आदेश पारीत करुन श्रीमती रेखा विजयसिंग सोळंकी यांना दिनांक १७/०९/१९९७ पासून नियमित सेवेत सामावून घेवून त्यांना त्याअनुषंगाने सर्व लाभ देण्याचे निर्देश दिले आहेत. या निर्णयाविरुध्द हिंगणघाट नगरपरिषदेकडून मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ येथे रिट याचिका ३४०६/२००८ दाखल केली होती. मा. उच्च न्यायालयाने दिनांक २८.०१.२०१६ च्या आदेशाने मा. औद्योगिक न्यायालयाचे आदेश कायम ठेवले आहेत. सदर आदेशाच्या विरुध्द नगरपरिषदेने मा. सर्वोच्च न्यायालयात स्पेशल लिव्ह पिटीशन CC No. ८७३/२०१७ दाखल केली. सदर याचिका मा. सर्वोच्च न्यायालयाने फेटाळली. श्रीमती रेखा सोळंकी

यांना सेवानिवृत्तीविषयक लाभ न मिळाल्यामुळे त्यांनी मा. औद्योगिक न्यायालय, नागपूर यांचेकडे COMPLAINT(ULP) No.-११/२०२१ तक्रार दाखल केली. सदर तक्रारीच्या अनुषंगाने मा.न्यायालयाचे दि.२३/०८/२०२३ रोजी आदेश पारीत करुन श्रीमती सोळंकी यांना मासिक सेवानिवृत्ती वेतनासोबत इतर सेवानिवृत्तीविषयक लाभ फेब्रुवारी, २०१८ पासून प्रत्यक्षात अदा करेपर्यंत ६ टक्के व्याजाने अदा करण्याचे निर्देश दिले होते. सदर आदेशाचे पालन न केल्यामुळे श्रीमती सोळंकी यांनी मा. कामगार न्यायालय, वर्धा येथे अवमान याचिका Contempt Complaint /४/२०२४ दाखल केली आहे. मा. कामगार न्यायालयात दाखल असलेल्या अवमान याचिकेच्या अनुषंगाने श्रीमती सोळंकी यांना सेवेत सामावून घेवून सेवानिवृत्तीचे लाभ विहित मुदतीत देणे आवश्यक असल्याने काल्पनिक पद निर्माण करण्याचा प्रस्ताव नगरपरिषद प्रशासन संचालनालयाने संदर्भ क्र.५ अन्वये सादर केला आहे. त्यानुसार हिंगणघाट नगरपरिषदेच्या आस्थापनेवर शिपाई संवर्गाचे एक पद निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे:-

**शासन निर्णय:-**

हिंगणघाट नगरपरिषदेच्या अंतर्गत श्रीमती रेखा विजयसिंग सोळंकी, शिपाई (सेवानिवृत्त) कर्मचारी यांनी सेवा नियमित करण्याबाबत मा. औद्योगिक न्यायालय, नागपूर येथे COMPLAINT(ULP) No.-२७७/२००० तक्रार दाखल केली होती. सदर तक्रारीच्या अनुषंगाने मा. औद्योगिक न्यायालयाने दिनांक १४/०१/२००८ रोजी पारीत केलेले आदेश तसेच मा. औद्योगिक न्यायालय, नागपूर यांचेकडील COMPLAINT(ULP) No.-११/२०२१ तक्रारीच्या अनुषंगाने मा.न्यायालयाने दि.२३/०८/२०२३ रोजी पारीत केलेले आदेश विचारात घेऊन, श्रीमती रेखा विजयसिंग सोळंकी, शिपाई (सेवानिवृत्त) यांच्याकरीता हिंगणघाट नगरपरिषदेच्या आस्थापनेवर शिपाई हे वर्ग-४ चे एक काल्पनिक पद निर्माण करण्यास खालील अटी शर्तीवर शासन मान्यता देण्यात येत आहे.

१) श्रीमती रेखा विजयसिंग सोळंकी यांना मा.न्यायालयाच्या निर्देशानुसार सेवानिवृत्तीचे अनुज्ञेय लाभ देण्याकरीता दिनांक २५/०८/२०१४ रोजीच्या शासन निर्णयाच्या अनुषंगाने विशेष बाब म्हणून पूर्वलक्षी प्रभावाने नगरपरिषद, हिंगणघाट आस्थापनेवर नियमित सेवेत दिनांक १७/०९/१९९७ पासून दिनांक ३१/०१/२०१८ रोजीपर्यंत वर्ग-४ चे शिपाई हे एक काल्पनिक पद निर्माण करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२) श्रीमती सोळंकी या दिनांक ३१/०१/२०१८ रोजी सेवानिवृत्त झाल्या असल्याने त्यांचेकरीता काल्पनिक पद निर्माण करुन सदरचे पद दिनांक ०१/०२/२०१८ रोजी आपोआप व्यपगत झाले असे मानण्यात येईल.

३) मा. न्यायालयाच्या आदेशाची या प्रकरणी अंमलबजावणी होण्याकरीता नगरपरिषद प्रशासन संचालनालयाने तात्काळ कार्यवाही आपल्या स्तरावर करावी.

४) भविष्यात सदर प्रकरण पुर्वोदाहरण म्हणून मानण्यात येऊ नये.

०२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक क्रमांक २०२५०३२६११२३४०३४२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIRUDDHA VENKTESH JEWLIKAR

Digitally signed by ANIRUDDHA VENKTESH JEWLIKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=29c6c42b5811a121a201ecd7aceaac3251c7d1ded31ff1b6e1a88d86b600c6bd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B986D51C7C29938C2BBB53D563F07DFC61C84B730CB9118407ECAB6A27C67C4C, cn=ANIRUDDHA VENKTESH JEWLIKAR
Date: 2025.03.26 11:24:21 +05'30'

**(अनिरुध्द व्यं.जेवळीकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा. मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उप मुख्यमंत्री (नगर विकास) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, बेलापूर, नवी मुंबई.
६. विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक, नगरपरिषद प्रशासन, नागपूर विभाग, नागपूर.
७. जिल्हाधिकारी,वर्धा.
८. मुख्याधिकारी, हिंगणघाट नगरपरिषद, जि.वर्धा.
९. निवडनस्ती (नवि-१८).